**सन २०१६-१७ करिता ताडी अनुज्ञप्त्या लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे वितरीत <u>करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टीओडी-०६१५/प्र.क्र.११६/राउशु-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २८ ऑक्टोबर, २०१६.

**<u>संदर्भ :</u>**- १) शासन अधिसूचना, गृह विभाग, दि.४ जून, २००१.
२) शासन अधिसूचना, गृह विभाग, दि.९ ऑगस्ट, २०१०.
३) शासन निर्णय, क्र.टीओडी-०६१५/प्र.क्र.११६/राउशु-३, दि.२५.८.२०१५.
४) आयुक्त, राउशु, मुंबई यांचे क्र.टीओडी-१८१४/ताडी-२०१६-१७/१६५२/अकरा, दि.२६ सप्टेंबर, २०१६.

**<u>प्रस्तावना</u>** :-

महाराष्ट्र ताडी दुकाने (लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती देणे) आदेश, २००१ नुसार ताडी दुकाने लिलाव व निविदा पध्दतीने वितरीत करण्याची पध्दती विहित करण्यात आली आहे. तथापि सन २००९-१० मध्ये सदर धोरणाचा पुनर्विचार होवून श्री.ए.के. जैन, तत्कालीन प्रधान सचिव यांच्या समितीच्या शिफारशीनुसार सन २००९-१० करिता लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती प्रदान करण्यात आली होती व तदनंतर पुढील ४ वर्षात सन २०१०-११ ते २०१३-१४ पर्यंत दरवर्षी अनुज्ञप्ती शुल्कात ६% वाढ करून अनुज्ञप्तीचे नुतनीकरण करण्यात आले होते.

सन २०१३-१४ हे नुतनीकरणाचे अखेरचे वर्ष असल्याने सन २०१४-१५ करिता नव्याने लिलाव-नि-निविदा प्रक्रियेद्वारे ताडी अनुज्ञप्ती प्रदान करण्यात आल्या आहेत. राज्यातील ताडी व्यावसायिकांच्या असलेल्या अडी-अडचणी विचारात घेता तसेच अनुज्ञप्तीच्या आधारे दुकान चालविणाऱ्यांना स्थैर्य प्राप्त व्हावे व या उद्योगात असलेले कामगार त्यांच्या नियमित रोजगारापासून वंचित राहू नयेत म्हणून पुढील वर्ष सन २०१५-१६ करिता जे अनुज्ञप्तीधारक सन २०१४-१५ मध्ये टीडी-१ अनुज्ञप्ती धारण करीत आहेत त्यांनी त्यांच्या सर्वोच्च यशस्वी बोलीवर १०% वाढ करून अनुज्ञप्ती शुल्क भरल्यास त्यांची अनुज्ञप्ती नमुना टीडी-१ चे नुतनीकरण करण्यात यावे, असा निर्णय घेण्यात आला होता. ताडी वर्ष सन २०१५-१६ हे दि.३१ ऑगस्ट, २०१६ रोजी संपल्यानंतर सप्टेंबर, २०१६ व ऑक्टोबर, २०१६ या महिन्यांसाठी मागील वर्षी कार्यरत असलेल्या ताडी अनुज्ञप्त्यांना मागील वर्षीच्या शुल्काच्या एक महिन्याच्या प्रमाणात रक्कम वसूल करून दि.३१ ऑक्टोबर, २०१६ अखेरपर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. उर्वरित ताडी वर्ष २०१६-१७ साठी धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

महाराष्ट्र ताडी दुकाने (लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती देणे) आदेश, २००१ नुसार, ताडी वर्ष २०१६-१७ करिता ताडी दुकाने लिलाव व निविदा पध्दतीने वितरीत करण्याच्या विहित पध्दतीनुसार खालील अटींच्या अधीन राहून टीडी-१ अनुज्ञप्त्यांचे वितरण बोलीधारकांना करण्यात यावे.

१) ताडी वृक्ष असलेल्या तालुक्यात कायम रहिवाशी असलेल्या व्यक्ती व तालुक्यातील सहकारी व भागीदारी नोंदणीकृत संस्थांमध्येच मर्यादित लिलाव करावा.
२) ज्या तालुक्यात किमान १००० परिपक्व ताडी झाडे आहेत त्याच तालुक्यात दुकाने देता येईल.
३) १००० परिपक्व ताडी झाडांमागे एक दुकान हे धोरण अवलंबण्यात यावे.
४) ज्या तालुक्यात ताडी दुकान (अनुज्ञप्ती) मंजूर आहे. ते मंजूर दुकान (अनुज्ञप्ती) त्या तालुक्यातून इतरत्र व मंजूर कार्यक्षेत्राबाहेर हलविता येणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१०२८१७३००५४०२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2016.10.28 17:33:10 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
**सह सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२३,
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
९. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
१०.निवड नस्ती.